**महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीच्या सहयोगाने भाषा व साहित्य याचा प्रचार-प्रसार करण्याच्या हेतूने घाटकोपर येथे "मन वासंती हुआ" या विषयाबाबत एक दिवसीय संगोष्ठीचे आयोजन करण्याकरिता होणा-या खर्चास मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन आदेश क्र. हिंसाअ - ७०१९ (१४)/प्र.क्र.३९/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०८ फेब्रुवारी, २०१९

वाचा :- महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीचे पत्र क्र. मराहिंसाअ/४०/२०१९, दिनांक ११ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्रातील वेगवेगळया संस्थांच्या माध्यमातून महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमी हिंदीच्या प्रचार-प्रसारासाठी वेगवेगळे उपक्रम राबवित असते. याअंतर्गत हिंदी भाषा आणि साहित्याच्या विकासासाठी वेगवेगळी चर्चासत्र, सेमिनार, परिसंवाद, संगोष्ठी इत्यादी कार्यक्रमांचे संयोजन करण्यात येते. त्यानुसार महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीच्या सहयोगाने भाषा व साहित्याच्या प्रचार-प्रसार करण्याच्या हेतूने घाटकोपर येथे दिनांक २१ जानेवारी, २०१९ रोजी एक दिवसीय राष्ट्रीय संगोष्ठीचे आयोजन करण्यात आले होते. त्याकरिता झालेल्या खर्चास कार्योत्तर मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

या शासन आदेशान्वये, महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीमार्फत घाटकोपर येथे दिनांक २१ जानेवारी, २०१९ रोजी आयोजित करण्यात आलेल्या एक दिवसीय संगोष्ठीच्या आयोजनाच्या रुपये ७७,१००/- (रुपये सत्त्याहत्तर हजार शंभर फक्त) इतक्या खालील बाबींवरील खर्चास कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | तपशील | प्रस्तावित खर्च (रुपये) |
|---|---|---|
| १. | सभागृह भाडे | रामनिरंजन झुनझुनवाला कला, विज्ञान, वाणिज्य महाविद्यालयाद्वारे नि:शुल्क उपलब्ध |
| २. | ध्वनी, प्रकाश व रंगमंच | १५,०००/- |
| ३. | मान्यवर, कलावंत मानधन व प्रवासखर्च | १०,०००/- |
| ४. | निमंत्रण पत्रिका डिझाईन व छपाई | ५,०००/- |
| ५. | बॅनर डिझाईन व छपाई | ५,०००/- |
| ६. | अल्पोपहार व भोजन व्यवस्था | ७,०००/- |
| ७. | फोटोग्राफी (छायाचित्रीकरण) | ७,०००/- |
| ८. | पोस्टेज | १,०००/- |

| | | |
|---|---|---|
| ९. | जाहिरात | १५,०००/- |
| १०. | निवेदक मानधन | २,१००/- |
| ११. | शॉल खरेदी | २,०००/- |
| १२. | अंतर्गत प्रवास खर्च | ५,०००/- |
| १३. | संकीर्ण | ३,०००/- |
| | **एकूण खर्च** | **७७,१००/-** |

३. या खर्चासंदर्भात संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्यात येत असून सहसंचालक, महाराष्ट्र हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर खर्च मागणी क्र. क्र. झेडडी-२, प्रधान लेखाशिर्ष २२०५, कला व संस्कृती १०२ कला संस्कृती यांचे प्रचालन, (०८) (०१) (२२०५ १६८८) (३१) सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा आदेश वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, उपविभाग-३, नियम क्र. २७ (२) अ नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थसं-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद क्रमांक ७ (१) (अ), (७), (८) परिशिष्टातील अट क्र. ८ मधील ४, ५, ९ आणि १० ची पुर्तता होत असून उर्वरित सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटी या प्रकरणी लागू होत नाहीत.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९०२१११२२१५२९३२३ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
Date: 2019.02.11 12:26:09 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२
२. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
५. सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमी, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, मुंबई/नागपूर, महाराष्ट्र राज्य
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १/२, मुंबई/नागपूर, महाराष्ट्र राज्य
१०. अवर सचिव, अर्थसंकल्प, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती, सां.का.४.